जखमा असलेल्या कुष्ठ रुग्णांच्या जखमांवर
ड्रेसिंग करण्यासाठी ड्रेसरना मंजूर असलेल्या
अनुदानात वाढ करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कुनिका २००९/५५/प्र.क्र.२३/आरोग्य-५

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १७ नोव्हेंबर, २०१४

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः कुनिका २००९/५५/प्र.क्र.२३/आरोग्य-५, दिनांक १९ सप्टेंबर, २०११**
२) **शासन शुध्दिपत्रक क्रमांकः कुनिका २००९/५५/प्र.क्र.२३/आरोग्य-५, दिनांक ३० डिसेंबर, २०११**
३) **सहसंचालक, आरोग्य सेवा, (कुष्ठ व क्षय), पुणे यांचे पत्र क्र. ससंआसे/कुष्ठ/ता.कक्ष/कुष्ठ वसाहत प्रस्ताव/४०८८५/१३, दिनांक ३/१०/२०१३**

**प्रस्तावना :-**

राज्यातील कुष्ठ पिडीतांच्या विविध मागण्यांबाबत मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २५ सप्टेंबर, २०१३ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. जखमा असलेल्या कुष्ठरुग्णांच्या जखमांवर ड्रेसिंग करण्यासाठी स्वयंभू कुष्ठ वसाहतीत राहणाऱ्या कुष्ठरुग्णांना शासकीय रुग्णालयात ओ.पी.डी.त जाऊन ड्रेसिंग करुन घेणे जिकिरीचे व गैरसोय होत असल्यामुळे अशा रुग्णांच्या जखमेवर ड्रेसिंग करण्याबाबत संबंधित कुष्ठरुग्ण दुसऱ्या व इच्छुक कुष्ठरुग्णाकडून ड्रेसिंग करुन घेतात. अशा ड्रेसिंग करणाऱ्या कुष्ठरुग्णास संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये जे मानधन मिळत होते, त्या मानधनात वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील ३२ स्वयंभू कुष्ठ वसाहतीत राहणाऱ्या आणि जखमा असलेल्या कुष्ठरुग्णांच्या जखमांवर ड्रेसिंग करण्यासाठी एका प्रशिक्षित कुष्ठरुग्णास खालील नमूद केलेल्या व्रण असलेल्या कुष्ठरुग्णांच्या संख्येनुसार त्या संख्येसमोर दर्शविलेल्या रकमेइतके

प्रतिमाह प्रोत्साहनपर मानधन मंजूर करण्यात येत आहे. सदर वाढीव मानधन दि.१ एप्रिल, २०१४ पासून लागू होईल..

| | | |
|---|---|---|
| १. | व्रण असलेल्या रुग्णांची संख्या ० ते ५० | रु.२०००/-प्रतिमाह |
| २. | व्रण असलेल्या रुग्णांची संख्या ५१ ते १५० | रु.४०००/-प्रतिमाह |
| ३. | व्रण असलेल्या रुग्णांची संख्या १५१ ते पुढे | रु.५०००/- प्रतिमाह |

२. सहायक संचालक, कुष्ठरोग यांनी जिल्हा न्युक्लीअस पथक (डीएनटी) यांच्यामार्फत सोबत जोडलेल्या परिशिष्टातील स्वयंभू कुष्ठ वसाहतीतील ड्रेसिंग करणास इच्छुक कुष्ठरुग्णास ड्रेसिंग करण्याबाबत प्रशिक्षित करणे आवश्यक राहील. सदर स्वयंभू कुष्ठ वसाहतीकडून सर्वानुमते ड्रेसिंग करण्यासाठी इच्छुक व पात्र कुष्ठरुग्णाचे नाव सहायक संचालक, कुष्ठरोग यांच्याकडे प्राप्त होणे आवश्यक आहे. अशा प्राप्त झालेल्या ठरावाच्या आधारे प्रत्येक स्वयंभू वसाहतीसाठी एक इच्छुक कुष्ठ रुग्णाची निवड संबंधित जिल्ह्याच्या सहायक संचालक, आरोग्य सेवा, कुष्ठरोग यांनी करावी.

३. मानधन मिळण्यासाठी खाली अटींची पुर्तता होणे आवश्यक आहे :-

(अ) ड्रेसिंग करण्यास इच्छुक व्यक्ती ही स्वत: कुष्ठरुग्ण असणे तसेच वर नमूद केल्याप्रमाणे ड्रेसिंगचे प्रशिक्षण घेतलेली असणे आवश्यक राहील.

(आ) व्रणोपचार रुग्णांची संख्या नावांच्या यादीसह ठेवणे बंधनकारक राहील.

(इ) प्रत्यक्ष भेटीच्यावेळी / महिन्यातून दोनवेळा, व्रणोपचार केलेल्या रुग्णांची संख्या योग्य व बरोबर असल्याचे संबंधित जिल्ह्याच्या सहायक सचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ) यांनी प्रमाणित करणे आवश्यक राहील.

(ई) व्रणोपचार करण्यासाठी मोफत औषध सामुग्री संबंधित जिल्ह्याच्या सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ) यांनी पुरवावी व ड्रेसिंग करणाऱ्या स्वयंसेवकाने त्यांच्या रजिस्टरमध्ये नोंद ठेवावी.

४. यासाठी येणारा खर्च लेखाशिर्ष २२१० ०६६५, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, १०१-रोग प्रतिबंध व नियंत्रण, (०१)(०१०) कुष्ठरोग नियंत्रणासाठी पथके व रुग्णालये, ०२-मजूरी या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबतची देयके पारित करण्यासाठी संबंधित वैद्यकीय अधिकारी, पर्यवेक्षीय नागरी कुष्ठरोग पथक / सहायक संचालक, कुष्ठरोग यांनी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पहावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. २३२/अर्थ-९, दिनांक २४/७/२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११७१५२००५५६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2014.11.17 17:43:00 +05'30'

(ज्ञा. ल . सुळ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), पुणे.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, (सर्व मंडळे).
४. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व).
५. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व).
६. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग सर्व)
७. वैद्यकीय अधिकारी, पर्यवेक्षीय नागरी कुष्ठरोग पथके (सर्व)
८. जिल्हा कुष्ठरोग प्रशिक्षण पथक (नागपूर व पुणे)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ / (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१०.जिल्हा लेखा व अधिदान अधिकारी (सर्व)
११.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१३.निवड नस्ती, आरोग्य - ५ कार्यासन.

## परिशिष्ट-अ

शासन निर्णय क्र. कुनिका २००९/५५/प्र.क्र.२३/आरोग्य-५, दि. १७ नोव्हेंबर, २०१४ चे सहपत्र.

| अ.क्र. | स्वयंभू कुष्ठ वसाहतीचे नाव | जिल्हा |
|---|---|---|
| १ | संजय गांधी कुष्ठ वसाहत, चुनाभट्टी | मुंबई |
| २ | संजय नगर कुष्ठ वसाहत, बोरीवली | मुंबई |
| ३ | पुष्पविहार कुष्ठवसाहत, बोरीवली | मुंबई |
| ४ | दत्तनगर कुष्ठवसाहत, ट्रॉम्बे | मुंबई |
| ५ | भारतमाता कुष्ठवसाहत, वडाळा | मुंबई |
| ६ | हनुमान नगर कुष्ठरोग सोसायटी, कल्याण | ठाणे |
| ७ | नेताजी समाज कुष्ठपिडीत संघ, उल्हासनगर | ठाणे |
| ८ | परचुरे शास्त्री कुष्ठवसाहत, अंबरनाथ | ठाणे |
| ९ | संजय गांधी कुष्ठ वसाहत, अंबरनाथ | ठाणे |
| १० | हाजीमलंग कुष्ठ वसाहत, कल्याण | ठाणे |
| ११ | श्री.दत्तनगर पाचू बंदर रोड कुष्ठवसाहत | ठाणे |
| १२ | कोपरी कॉलनी गांधीनगर कुष्ठवसाहत | ठाणे |
| १३ | जीवन विकास कुष्ठ वसाहत, सोलापूर | सोलापूर |
| १४ | कुष्ठरोग धर्मशाळा, पंढरपूर | सोलापूर |
| १५ | इंदिरा कुष्ठधाम, पंढरपुर | सोलापूर |
| १६ | कुष्ठवसाहत उदयमनगर, शिरगाव | रत्नागिरी |
| १७ | सुरक्षा नगर कुष्ठवसाहत, पुणे | पुणे |
| १८ | आनंदवन कुष्ठधाम, दापोडी | पुणे |
| १९ | अंतुलेनगर कुष्ठवसाहत, कोंढवा | पुणे |
| २० | महादेव नगर कुष्ठवसाहत, पिंप्री | पुणे |
| २१ | मिनु मेहता वसाहत, कोंढवा | पुणे |
| २२ | भिम नगर कुष्ठ वसाहत | परभणी |
| २३ | संजयगनर कुष्ठवसाहत, अहमदनगर | अहमदनगर |

| | | |
|---|---|---|
| २४ | कुष्ठवसाहत, गेंडामाळ | सातारा |
| २५ | महाराष्ट्र कुष्ठपिडित सहाय्यक संस्था | नाशिक |
| २६ | लालनगर कुष्ठवसाहत, इचलकरंजी | कोल्हापूर |
| २७ | स्वाधारनगर कुष्ठवसाहत, शेंडापार्क | कोल्हापूर |
| २८ | श्री.स्वामी कुष्ठधाम, अंभोरा | अकोला |
| २९ | मेघजीभाई वाडी कुष्ठवसाहत, मिरज | सांगली |
| ३० | आंबेवाडी कुष्ठवसाहत, मिरज | सांगली |
| ३१ | महात्मा गांधी कुष्ठवसाहत, गांधीनगर | सांगली |
| ३२ | महात्मा गांधी कुष्ठवसाहत, गांधीनगर | लातूर |

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2014.11.17 17:45:49 +05'30'

(ज्ञा. ल. सुळ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन